बृहन्मुंबई पोलीस- गणवेष शिलाईच्या
देयकास कार्योत्तर मंजूरी देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.;युएनएफ १०८ २/ प्र.क्र.८ / पोल-४
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २५ ऑगस्ट,२००३.

**वाचा** :- पोलीस उपआयुक्त, सशस्त्र पोलीस, ल.विभाग-१, नायगांव, मुंबई यांचे पत्र क्र.पोउआ/लवि-१/ किदर्व/७५/२००२, दिनांक २९.७.२००२ व पत्र क्र.पोउआ /सपो-१ /अराशिं /६१ /०३, दि.२०.३.०३.

**शासन निर्णय** :- पोलीस उपआयुक्त, सशस्त्र पोलीस ल.विभाग-१, नायगांव, मुंबई यांना बृहन्मुंबई पोलीस आयुक्त,पोलीस कल्याण केंद्र, वरळी,मुंबई यांनी ४०० गणवेश संच शिवून दिले त्याबाबतचे शिलाईचे देयक रु. ३२०००/- (रु. बत्तीस हजार फक्त) प्रलंबित असून सदर प्रलंबित गणवेश शिलाईच्या देयकास कार्योत्तर शासन मंजुरी देण्यात येत आहे.कार्योत्तर मंजुरीबाबतची विहित नमुन्यातील माहिती सोबत जोडण्यात आलेली आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र.बी-१ लेखाशिर्ष "२०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस ०२ शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना," खाली खर्ची टाकून तो चालू सन २००३-२००४च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र १०००/ प्र.क्र.४० / २००१/ विनिमय, दिनांक ११.७.२००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१ ला, उपविभाग-१ मधील अनुक्रमांक- ६, नियम ४० नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन प्रधान सचिव (विशेष ), गृह विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा.बा.घाडगे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
पोलीस उपआयुक्त, सशस्त्र पोलीस, लवि.१,नायगांव, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग ( व्यय-७/ विनियम),मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (पोल-४).

गृह विभाग शासन निर्णय क्र.युएनएफ १००२/प्र.क्र.८/पोल-४,
दिनांक : २५ ऑगस्ट, २००३
( कार्योत्तर मंजूरीबाबतची विहित नमुन्यातील माहिती. )

| | | |
|---|---|---|
| १ | प्रदान शीर्ष | गृह विभाग बी-१,२०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस, ०२ शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना |
| २ | खर्च केल्याचा कालावधी | २१.२.२००० |
| ३ | | गणवेष शिलाई |
| ४ | | ३२,०००/- |
| ५ | अगोदर मंजूरी न घेण्याची कारणे | पोलीस कल्याण केंद्र वरळी यांचेकडून वेळेवर गणवेष संच शिवून देण्यात येणार होते. |
| ६ | अधिकाऱ्याने केलेली कार्यवाही योग्य होती का | योग्य होती. |
| ७ | कार्योत्तर मंजूरीसाठी त्वरीत प्रस्तावाची कार्यवाही केली का | त्वरीत प्रस्तावाची कार्यवाही करण्यात आली. |